संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव ,ता.जि.अमरावती येथे
मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी विकास आराखडा
निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः : तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४**
हूतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
तारीखः ३ डिसेंबर, २०१४

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः** तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४, दिनांक २२ ऑक्टोबर, २०१२.
२) **शासन निर्णय क्रमांकः** तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.६२/का.१४४४, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१३.
३) **शासन निर्णय क्रमांकः** तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४,दिनांक २३ सप्टेंबर, २०१३.

प्रस्तावना -

संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर, २०१२ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठी सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या आराखड्यातील कामांसाठी वितरीत तरतूद मार्च, २०१५ अखेर खर्च करण्याचे नियोजन करण्यात येईल, या अटीच्या अधिन राहून, विभागीय आयुक्त, अमरावती यांना ₹५.७६ कोटी निधी वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे:-

| उद्दिष्ट निहाय बाबी | रुपये हजारात |
|---|---|
| १३, कार्यालयीन खर्च | ६० |
| २६,जाहिरातव प्रसिध्दी | ६० |
| २७,लहान बांधकामे | २,७४,८० |
| ५३,मोठी बांधकामे | ३,००,०० |
| **एकूण** | **५,७६,००** |

२ सदरहू खर्च लेखाशिर्ष "मागणी क्रमांक ओ-८, ३४५२- पर्यटन, ०१- पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००)(०७) संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.व जि.अमरावती, पर्यटन स्थळ विकास आराखडा (३४५२ २८८३) योजनांतर्गत योजना (दत्तमत)" याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र-अंदाज.२०१४.क्र.प्र/११०/अर्थ-३, दिनांक १ जुलै,२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०३१६४०१५८५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jagtap Ramesh N

Digitally signed by Jagtap Ramesh N
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jagtap Ramesh N
Date: 2014.12.03 16:47:36 +05'30'

**(र.ना.जगताप)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती .
४. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, अमरावती.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती .
७. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.